**महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेमधील ४६३ अस्थायी पदांना सन २०२०-२१ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०२०/प्र.क्र.४४/फ-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० मार्च, २०२०

वाचा :-

१. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.०८(१९-२०)/१७८१, दिनांक १८.२.२०२०
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१३४/फ-९, दि.०२.०४.२०१९
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१३४/फ-९, दि.१०.१०.२०१९
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२०

शासन निर्णय :-

महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४६३ पदास सन २०१९-२० या आर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१९ पासून दिनांक २९.०२.२०२० पर्यंत पूढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र.२ व ३ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भ क्र.१ अन्वये मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सन २०२०-२१ करीता प्रस्तावातील ४६३ अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे.

संदर्भ क्र.४ येथील वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १२.०२.२०२० अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही. अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना **दिनांक ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० या सहा महिन्यांच्या कालावधीसाठी** मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४६३ पदांना सन २०२०-२१ मध्ये पुढे दिनांक ०१.०३.२०१९ ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत चालू ठेवण्याबाबतचा प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचेकडील संदर्भ क्र.१ वरील दि.१८.०२.२०२० च्या पत्रासोबतचा प्रस्ताव व वित्त विभागाने संदर्भ क्र.४ नुसार दिलेल्या सुचना विचारात घेता या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४६३ अस्थायी पदांना **दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या सहा महिन्याच्या कालावधीसाठी** चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या विवरण पत्रानुसार शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०१ वनीकरण, १०५ वनोत्पादने, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन, (०१) (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (तेंदू) (२४०६ ०४५२), (०१) वेतन या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ मध्ये उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा व मान्य होणाऱ्या अर्थसंकल्पीय तरतुदींच्या मर्यादेतच उपरोक्त पदांसाठी खर्च करावा. सदर

कालावधीमध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृत्तीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृत्तीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०१६५६३६४७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.30 16:59:47 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म. रा., नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ट वनोपज, संनियंत्रण व मुल्यांकन), म. रा., नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.
६. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. मुख्य वनसंरक्षक नागपूर, गडचिरोली, चंद्रपूर, यवतमाळ, अमरावती, औरंगाबाद, धुळे, नाशिक वनवृत्त.
८. महालेखापाल १ / २ (लेखा परीक्षा ) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग/ व्यय-१०, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
१०. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग ( निवड नस्ती).

**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४४/फ-९, दिनांक ३० मार्च, २०२०**

**सोबतचे विवरणपत्र**

(दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० या सहा महिन्याच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आलेली पदे)

| **अ.क्र.** | **पदनाम** | **एकूण** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ट वनोपज, सनियंत्रण व मुल्यांकन) | १ |
| २ | कार्यालय अधिक्षक | ८ |
| २ | लेखापाल | १ |
| ३ | वनपाल | २२ |
| ४ | वनरक्षक | ३५९ |
| ५ | लिपीक | ६० |
| ६ | शिपाई | १२ |
| | **एकूण:-** | **४६३** |

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.30 17:00:04 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**********